**ई-गव्हर्नस कार्यक्रमांतर्गत सुरु असलेलया विविध प्रकल्पांसाठी कार्यरत संगणक तज्ञ/Resources च्या सेवा Maha-IT मार्फत उपलब्ध करुन घेण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५१९/प्र.क्र.८/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- २१ नोव्हेंबर, २०१९

वाचा :-

१) सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, शासन निर्णय क्र.मातंसं-१७१७/ प्र.क्र.१११/ ३९, दिनांक ९ एप्रिल, २०१९.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक ईगव्ह-१५१९/प्र.क्र.८/संगणक, दि.२८ मे, २०१९.
३) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.आशि/२०१९/Maha-IT/आस्था क्र.१४३/ ४८२४, दि.७ ऑगस्ट, २०१९ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

संदर्भ क्र.१ नुसार महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून दि.१.०४.२०१९ ते दि.३१.०३.२०२० या कालावधीकरीता तांत्रीक मनुष्यबळ पुरवठयाबाबतची कार्यपध्दती विहीत करण्यात आलेली आहे. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या ई गव्हर्नन्स अंतर्गत NIC, पुणे येथे सध्या विविध प्रकल्पांची कामे सुरु आहेत. संदर्भ क्र.२ अन्वये दि.०१.०४.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ साठी निधी वितरीत करण्यात आला आहे. सध्या कार्यरत असलेल्या सर्व २२ संगणक तज्ञ/Resources च्या सेवा यापुढील काळातहि आवश्यक आहेत. त्यानुसार आयुक्त शिक्षण, पुणे यांनी संदर्भ क्र.३ नुसार प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने ई-गव्हर्नस कार्यक्रमांतर्गत सुरु असलेलया विविध प्रकल्पांसाठी कार्यरत programmers च्या सेवा Maha-IT मार्फत उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

२. Maha-IT मार्फत दि.१.१०.२०१९ ते दि. ३१.०३.२०२० या कालावधीकरिता २२ संगणक तज्ञ/ Resources च्या सेवा उपलब्ध करुन घेण्यासाठी, आवश्यक असलेली रु.७८,५८,०६५/- (रुपये अठ्ठयाहत्तर लाख अठ्ठावन्न हजार पासष्ट फक्त ) एवढी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-2, 2202 सर्वसाधारण शिक्षण, 80 पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (02) (51) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (2202 H 454 ) 31 सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०१९-२० च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा ) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२११५०५५१६६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2019.11.21 15:09:28 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.